केंद्र पुरस्कृत अपंग एकात्म शिक्षण योजनेतील ५२ विशेष शिक्षक यांचे सप्टेंबर, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीतील थकीत वेतन अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- आयईडीएस-२०२१/प्र.क्र.२२/एसडी-१**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२**
**दिनांक :- ०७ मार्च, २०२५**

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय क्र. आयईडीएस-२०२१/प्र.क्र.२२/एसडी-१, दि.१७.०३.२०२१, दि.३१.०३.२०२१, दि.२१.१०.२०२२, दि.०७.११.२०२२ व दि.३०.११.२०२३, दि.२७.१२.२०२४
२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.१६.१२.२०२४ रोजीचे पत्र
३) वित्त विभागाचे क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ चे परिपत्रक

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन १९७८ पासून विशेष गरजा असलेल्या अपंग विद्यार्थ्यांना सामान्य मुलांबरोबर शाळेत शिक्षण घेता यावे, यासाठी अपंग एकात्म शिक्षण योजना (प्राथमिक स्तर) सुरु केली. सदर योजनेंतर्गत नियुक्त करण्यात आलेल्या तथापि, माध्यमिक युनिटवर कार्यरत असलेल्या विशेष शिक्षकांचे नोव्हेंबर, २०२३ ते ऑगस्ट, २०२४ या कालावधीतील वेतन संदर्भ क्र.१ येथील दि.२७.१२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये अदा करण्यात आले आहे. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ५२ विशेष शिक्षकांचे सप्टेंबर, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीतील थकीत वेतन अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासनास केली आहे.

सदर विनंतीस अनुसरुन अपंग एकात्म शिक्षण योजना (प्राथमिक स्तर) योजनेंतर्गत नियुक्त करण्यात आलेल्या तथापि, माध्यमिक युनिटवर कार्यरत असलेल्या ५२ विशेष शिक्षकांचे सप्टेंबर, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीतील वेतन अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय पुढीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय :-**

अपंग एकात्म शिक्षण योजना (प्राथमिक स्तर) योजनेंतर्गत नियुक्त करण्यात आलेल्या तथापि, माध्यमिक युनिटवर कार्यरत असलेल्या ५२ विशेष शिक्षकांचे सप्टेंबर, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीतील थकीत वेतन अदा करण्यासाठी रु.४,४०,००,०००/- (रु. चार कोटी चाळीस लक्ष फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी थकीत वेतनाची रक्कम संबंधित ५२ विशेष शिक्षकांच्या खात्यात जमा करावी. वेतनाची रक्कम संबंधित विशेष शिक्षकांच्या खात्यात जमा होईल, याची काळजी घावी. एखाद्या शिक्षकाचे नाव दुबार आढळून आल्यास अशा प्रकरणी एकदाच वेतन अदा होईल, याची दक्षता घ्यावी. अधिकचे वेतन अदा झाल्याचे निदर्शनास आल्यास शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना जबाबदार धरण्यात येईल.

३. उक्त विशेष शिक्षकांना कोणत्याही न्यायालयीन प्रकरणाच्या अनुषंगाने सप्टेंबर, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीसाठी यापूर्वी वेतन अदा करण्यात आले असल्यास सदर शासन निर्णयातील परिच्छेद २ मध्ये नमूद केल्यानुसार परिगणना करुन अनुज्ञेय होणा-या रकमेतून सदर रक्कम समायोजित करुन उर्वरित रक्कम अदा करण्यात यावी.

४. विशेष शिक्षकांना अदा करण्यात आलेल्या वेतनाची वसूली सदर शिक्षकांच्या समायोजनासंदर्भात शासन स्तरावर घेतल्या जाणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन असेल, अशा आशयाचे बंधपत्र, वेतन अदा करताना संबंधित विशेष शिक्षकाकडून घेण्यात यावे.

५. उपरोक्तप्रमाणे वेतन अदा केल्यानंतर निधी शिल्लक राहिल्यास त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. शिल्लक निधीचा विनियोग करण्यापूर्वी शासनाची पूर्वपरवानगी घेण्यात यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र एक महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावे.

६. सदर खर्च “मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६ शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२०२ आय ६१२)” या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा. यासाठी सहसचिव / उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांना “नियंत्रक अधिकारी” व अवर सचिव / कक्ष अधिकारी, रोख / लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांना “आहरण व संवितरण अधिकारी”म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधी कोषागारातून आहरीत करुन राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक परिषद, मुंबई यांच्या SNA खात्यात जमा करावा. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक परिषद, मुंबई यांनी शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कडे सुपूर्त करावा.

७. सदर प्रकरणी शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तातडीने कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल त्यांच्या स्तरावर आढावा घेऊन दर १५ दिवसांनी शासनास सादर करावा.

८. वित्त विभाग, शासन निर्णय/परिपत्रक दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरीताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२१/१४७१, दि.१३.०१.२०२५ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १३३/व्यय-५, दि.१२.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०७११४५३८११२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAMDAS GANPAT DHUMAL

Digitally signed by RAMDAS GANPAT DHUMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=24F4ACDDCFF993441F6C634862546E9D122E0DB556806B179B794879ACF360F5, cn=RAMDAS GANPAT DHUMAL
Date: 2025.03.07 11:46:49 +05'30'

**(रामदास धुमाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विधानसभा अध्यक्ष/ मा. विधानपरिषद सभापती, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय , मुंबई
५. मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन (मुंबई सर्व).
६. मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व.
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
८. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१०.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
१३.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३
१४.सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१५.अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१६. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१८. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती (एसडी-१)